**ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीनच्या साठवणूकीसाठी नवीन गोडाऊन बांधण्याच्या खर्चासाठी आकस्मिकता निधीतून रक्कम वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: बीयुडी-२०२०/प्र.क्र.५७७/२०/का.३३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ०४ नोव्हेंबर, २०२०.

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.ईव्हीएम-२०१९/प्र.क्र.१४८२/१९/का.३३, दिनांक १७.०९.२०२०
२) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.ईव्हीएम-२०१९/प्र.क्र.१४८२/१९/का.३३, दिनांक २२.१०.२०२०
३) वित्त विभाग ज्ञापन क्रमांक- आकनि-२०२०/प्र.क्र.०७/अर्थ-१४, दिनांक २५.०९.२०२०

**प्रस्तावना:-**

भारत निवडणूक आयोगाच्या निर्देशानुसार ईव्हीएम/व्हीव्हीपॅटच्या साठवणूकीकरिता कायमस्वरूपी नवीन गोदामे बांधणे, तसेच महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाकडून भाडेपट्ट्याने घेतलेल्या गोदामांमध्ये आवश्यक बदल/दुरूस्तीची कामे करणे आवश्यक आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सदर गोदामे बांधण्यासाठी कोणतेही लेखाशीर्ष उपलब्ध नसल्याने ईव्हीएम/व्हीव्हीपॅटच्या साठवणूकीसाठी गोदामांचे बांधकाम करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने उपभोक्ता विभाग म्हणून प्रशासकीय मान्यता देवून आर्थिक तरतूद करून निधी उपलब्ध करून देण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने अभिप्राय दिले आहेत. यास्तव, संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक १७.०९.२०२० व शासन शुध्दीपत्रक दिनांक २२.१०.२०२० अन्वये ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीनच्या साठवणूकीसाठी गोदामे बांधणे व दुरूस्ती करण्याच्या खर्चाच्या तरतूदीसाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यात आले आहे. नवीन लेखाशीर्ष उघण्यात आल्यानंतर ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीनच्या साठवणुकीसाठी गोडाऊन बांधणे व दुरुस्ती करणे या तातडीच्या कामासाठी वित्त विभागाने संदर्भाधिन दिनांक २५.०९.२०२० च्या ज्ञापनान्वये आकस्मिकता निधीतून रु.१९.७३ कोटी इतका निधी मंजूर झालेला आहे. सदर मंजूर निधीपैकी रु.१४,०९,६०,०००/- इतका निधी एकूण १० जिल्हयांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीनच्या साठवणूकीसाठी आवश्यक नवीन गोडाऊन बांधकामासाठी संबंधित जिल्हयांकडून पाठविण्यात आलेल्या प्रस्तावातील अंदाजपत्रकानुसार अंदाजपत्रकीय किंमतीच्या १२.५ % रक्कम वित्त विभागाद्वारे आकस्मिकता निधीमधून मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर निधीतून जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, कोल्हापूर, गोंदिया, भंडारा, नाशिक, अमरावती, बुलढाणा, यवतमाळ, सिंधुदूर्ग, वाशिम, चंद्रपूर यांना ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीनच्या साठवणूकीसाठी नवीन गोडाऊन बांधण्याच्या खर्चासाठी पुढीलप्रमाणे एकूण रु.१४,०९,६०,०००/- (रूपये चौदा कोटी नऊ लक्ष साठ हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्यालय | अंदाजपत्रकीय किंमत (रुपये लक्ष) | वितरीत करावयाची रक्कम (१२.५%) (रूपये लक्ष) |
|---|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, कोल्हापूर | १२५०.२३ | १५६.२८ |
| २ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, गोंदिया | ९२६.१३ | ११५.७६ |
| ३ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, भंडारा | १४०४.९९ | १७५.६२ |
| ४ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, नाशिक | १०७८.०० | १३४.७५ |
| ५ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, अमरावती | १४९९.६१ | १८७.४५ |
| ६ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, बुलढाणा | १४६२.२६ | १८२.७८ |
| ७ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, यवतमाळ | ११६६.१९ | १४५.७७ |
| ८ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, सिंधुदूर्ग | ७९९.३५ | ९९.९२ |
| ९ | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, वाशिम | ८९०.७६ | १११.३५ |
| १० | जिल्हाधिकारी व जिल्हा निडणूक अधिकारी, चंद्रपूर | ७९९.३५ | ९९.९२ |
| **एकूण** | | **११२७६.८७** | **१४०९.६०** |

२. संबंधित जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांनी आकस्मिकता निधीमधून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधिच्या आदेशात/पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करतांना कोषागारात सादर करण्यात येणाऱ्या देयकावर **"आकस्मिकता निधी अग्रीम वित्त विभाग, ज्ञापन क्रमांक: आकनि-२०२०/प्र.क्र.०७/अर्थ-१४, दिनांक २५.०९.२०२० अन्वये मंजूर"** असे लाल शाईने लिहावे, अशा स्पष्ट सूचना नमूद करण्यात याव्यात. ही सूचना लाल शाईने अधोरेखित करावी.

३. सदर खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक ए-०९,**
**लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च,**
**००**
**१०१-निवडणूक**
**००**
**(००)(०१) ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीनच्या साठवणुकीसाठी नवीन गोडाऊन बांधणे व दुरुस्ती (कार्यक्रम) (४०७० ०३२९)**
**५३-मोठी बांधकामे**
**आकस्मिकता निधी संकेतांक (८००० ७६९२)**

४. सदर तरतूद खर्च करण्यासाठी उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी व त्यांच्या अधिनस्त संबंधित जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच संबंधित जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांच्या अधीन संबंधित जिल्हयांचे उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी तसेच संबंधित जिल्हयाचे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे संबंधित जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व खर्चाची माहिती मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयास पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौ. संदर्भ क्रमांक: २६०/२०२०/व्यय-४, दिनांक २२.०९.२०२० आणि वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि-२०२०/प्र.क्र.०७/अर्थ-१४, दिनांक २५.०९.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०४१२०३३५१४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manoj Tarachand Nukte

Digitally signed by Manoj Tarachand Nukte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=70c9041272ba01816f5cc80df55c2f2f65fac1604201623187cba1a9d7b5628f, serialNumber=a25d479cd6f4fd6be08ad68ca5767a5d7247dcc97e53cc34d24c998c0861e504, cn=Manoj Tarachand Nukte
Date: 2020.11.06 17:47:13 +05'30'

**(म.ता. नुक्ते)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई
११. जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, कोल्हापूर, गोंदिया, भंडारा, नाशिक, अमरावती, बुलढाणा, यवतमाळ, सिंधुदूर्ग, वाशिम, चंद्रपूर
१२. कार्यासन (व्यय-४, अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती/का.क्र.३३